सैनिकी व नागरी सेवेवरील दोन कुटूंबनिवृत्तीवेतने मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सेनिवे २०१३/प्र. क्र.६१/सेवा ४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २७ एप्रिल, २०१५.

**प्रस्तावना —**

महाराष्ट्र नागरी सेवा(निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मधील नियम ११६(१७) व (१८) नुसार सैनिकी सेवेतून सेवानिवृत्त होवून पुनर्नियुक्त होणाऱ्या माजी सैनिकांच्या कुटूबांस नागरी सेवेतील सेवेवर कुटूंब निवृत्तीवेतन अनुज्ञेय नाही. केंद्र शासनाच्या रक्षा मंत्रालयाने दि.१७.०१.२०१३ च्या परिपत्रकानुसार माजी सैनिकांच्या कुटूंबास सैनिकी व नागरी अशा दोन्ही सेवेतील कुटूंब निवृत्तीवेतनाचा लाभ अनुज्ञेय केला आहे. हा लाभ राज्य शासनाच्या सेवेत पुनर्नियुक्त होणाऱ्या माजी सैनिकांच्या कुटूंबास लागू करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

**शासन निर्णय—**

सैनिकी सेवेतून सेवानिवृत्त होवून दि.०१.११.२००५ पुर्वी राज्य शासनाच्या सेवेत नागरी पदावर पुनर्नियुक्त झालेल्या माजी सैनिकाचा सेवेत असताना/ सेवानिवृत्तीनंतर मृत्यु झाल्यास त्याच्या कुटूंबास सैनिकी व नागरी अशा दोन्ही सेवेतील कुटूंब निवृत्तीवेतन अनुज्ञेय करण्यासाठी राज्य शासनाने महाराष्ट्र नागरी सेवा(निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मधील नियम ११६(१७) व (१८) मध्ये बदल करण्याचा निर्णय घेतला आहे.

२. हा लाभ भुतलक्षी (retrospective) प्रभावाने दि.२४.०९.२०१२ पासून लागू राहील. त्यामुळे मृत माजी सैनिकाच्या कुटूंबास हा लाभ दि.२४.०९.२०१२ पासून देय होईल. जे माजी सैनिक दि.२४.०९.२०१२ पुर्वी मृत्यु पावले आहेत त्यांच्या कुटूंबातील पात्र कुटूंब निवृत्तीवेतनधारकांना देखील सदर लाभ दि.२४.०९.२०१२ पासून लागू राहील.

३. माजी सैनिक सेवानिवृत्तीपुर्वी/मृत्युपुर्वी ज्या कार्यालयात कार्यरत होता त्या कार्यालय प्रमुखाकडे पात्र कुटूंब निवृत्तीवेतनधारकाने (महाराष्ट्र नागरी सेवा(निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मधील नियम ११६ (१६)(बी) मधील कुटूंबाची व्याख्या व दि.२२.०१.२०१५ चा शासन निर्णय) नागरी सेवेतील कुटूंब निवृत्तीवेतन मिळण्यासाठी खालील कागदपत्रांसह अर्ज करावा-

१) माजी सैनिकाच्या मृत्युचा दाखला,

२) सैनिकी सेवेतून मिळत असलेल्या कुटूंब निवृत्तीवेतनाबाबतच्या आदेशाची प्रत (PPO),

३) माजी सैनिकास नागरी सेवेकरीता निवृत्तीवेतन मिळत असल्यास त्या आदेशाची (PPO) प्रत.

४. हा लाभ जे माजी सैनिक राज्य शासनाच्या नागरी सेवेत दि.०१.११.२००५ पुर्वी नियुक्त झाले आहेत यांनाच अनुज्ञेय होईल.

५. जे माजी सैनिक नागरी सेवेतील सेवानिवृत्तीनंतर सैनिकी व नागरी सेवेचे निवृत्तीवेतन घेत आहेत त्यांनी दोन कुटूंब निवृत्तीवेतनाकरीता तो ज्या कार्यालयातून सेवानिवृत्त झाला आहे, त्या

कार्यालय प्रमुखाकडे अर्ज करावा. अर्जामध्ये कायदेशीर पत्नी/पतीचे नाव, एकटया शासकीय कर्मचाऱ्याच्या बाबतीत त्याच्यावर अवलंबून असलेल्या आई-वडिलांचे नाव (महाराष्ट्र नागरी सेवा(निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मधील नियम ११६ (१६)(बी) मध्ये नमूद केल्यानुसार सर्व पात्र कुटूंब निवृत्तीवेतनधारक), कायमस्वरुपी निवासी पत्ता, पती पत्नीचा एकत्रित फोटो (३ प्रती) या बाबींचा समावेश असावा.

६. अर्जासोबत नागरी सेवेवर मिळत असलेल्या निवृत्तीवेतनाच्या आदेशाची प्रत जोडावी.

७. कार्यालय प्रमुखाने विहीत कार्यपद्धतीचा अवलंब करुन कुटूंब निवृत्तीवेतनाच्या प्राधिकारपत्राकरिता महालेखापाल कार्यालयाकडे कागदपत्रे सादर करावीत.

८. शासन असाही आदेश देत आहे की, ज्यांना निवृत्तिवेतन योजना लागू केलेली आहे अशा मान्यता व अनुदान प्राप्त शैक्षणिक संस्था, कृषितर विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्न असलेली अशासकीय महाविद्यालये व कृषि विद्यापीठे यामधील निवृत्तिवेतनधारक/कुटूंब निवृत्तीवेतनधारक यांना वरील निर्णय योग्य त्या फेरफारासह लागू राहील.

९. महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समिती अधिनियम १९६१ (सन १९६२ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक पाच) च्या कलम २४८ च्या परंतुकान्वये प्रदान केलेले अधिकार आणि त्यासंबंधीचे इतर सर्व अधिकार याचा वापर करुन शासन असाही आदेश देत आहे की, वरील निर्णय जिल्हा परिषदांचे निवृत्तिवेतनधारक/कुटूंब निवृत्तीवेतनधारक यांनाही लागू राहील.

१०. सदर शासन निर्णयाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४२७१८१४४९९८०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Pandurang Pandhare

Digitally signed by Sunil Pandurang Pandhare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8b7dc58e83c9774e4419a7aeeac77eae7cdea272d759dfb29451bcfe7e3f04c9, cn=Sunil Pandurang Pandhare
Date: 2015.04.27 18:29:31 +05'30'

**( सुनिल पांढरे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई (१००० प्रती),
२) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर(१००० प्रती),
३) महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई (५ प्रती),
४) महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर (५प्रती),
५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई (५ प्रती),

६) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई (२५ प्रती),
७) संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई,(१० प्रती)
८) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई (१० प्रती),
९) उप-मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,मुंबई/ पुणे/नागपूर/औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती (प्रत्येकी १०प्रती),
१०) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक (प्रत्येकी १५ प्रती),
११) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),
१२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (प्रत्येकी १० प्रती),
१३) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई
१४) राज्यपालांचे सचिव,
१५) मुख्य मंत्र्यांचे सचिव,
१६) उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
१७) सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,
१८) *विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
१९) *प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा) मुंबई,
२०) *प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा),मुंबई,
२१) *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
२२) *सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
२३) *प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
२४) *प्रबंधक, मुंबई महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण /नागपूर/औरंगाबाद
२५) मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र, मुंबई.
२६) आयुक्त, राज्य माहिती आयोग (सर्व)
२७) सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, १ला मजला, मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२
२८) सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, १ला मजला, मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२
२९) सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग,गृहनिर्माण भवन (म्हाडा बिल्डींग), पोट माळा, वांद्रे पूर्व, मुंबई ४०० ०५१.
२९) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई - ४०० ०३२.
३१) कार्याध्यक्ष, महाराष्ट्र पेन्शनर्स असोसिएशन, १४४९, सदाशिव पेठ, 'संकल्प खजिना महाल बोळ, एस.पी.कॉलेज समोर, पुणे ४११ ०३०
३२) अध्यक्ष, महाराष्ट्र स्टेट गव्हर्नमेंट पेंशनर्स असोसिएशन बेळगाव, १०९१, अनंतशयन गल्ली, लक्ष्मी निवास, दुसरा मजला, बेळगांव.
३३) मंत्रालयातील सर्व विभाग,

३४) मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
३५) सर्व विभागीय आयुक्त (प्रत्येकी ५ प्रती),
३६) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),
३७) सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष
३८) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),
३९) शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती),
४०) तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई (५ प्रती),
४१) सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण) (प्रत्येकी ५ प्रती),
४२) संचालक, महानगरपालिका प्रशासन, मुंबई (५ प्रती),
४३) सर्व विभागीय शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),
४४) सर्व विभागीय तंत्र शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),
४५) कुल सचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर (१० प्रती),
४६) कुल सचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ , परभणी (१० प्रती),
४७) कुल सचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला (१० प्रती),
४८) कुल सचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी (१० प्रती),
४९) कुल सचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर (१० प्रती),
५०) कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ, लोणेरे, जिल्हा रायगड (१० प्रती),
५१) कुलसचिव, सोलापूर विद्यापीठ, सोलापूर (५ प्रती),
५२) बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई १ (५ प्रती)
५३) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरॅक नं. १, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक,नरिमन पॉईंट , मुंबई २० (५ प्रती)
५४) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस.व्ही.पटेल रोड,, मुंबई ४ ( ५ प्रती)
५५) भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई १३ (५प्रती )
५६) इंडियन नॅशनल कॉँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई २५ (५ प्रती )
५७) नॅशनलिस्ट कॉँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई २१ ( ५ प्रती )
५८) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई २८ (५ प्रती)
५९) वित्त विभागातील सर्व कार्यासने,
६०) निवड नस्ती, कार्यासन सेवा-४.
*पत्राद्वारे.

**Grant of dual family pension from Military as well as Civil employment.**

## Government of Maharashtra
## Finance Department
## Government Resolution No.: PEN 2013/C.R.61/SER-4

Madam Cama Road, Hutatma Rajguru Chowk,
Mantralaya, Mumbai-400 032.
Date: 27th April, 2015.

**Introduction -**

Family pension w.r.t the Civil employment in the State Government is not admissible to the families of Ex-Servicemen who were re-employed in the State Government on a civil post after having retired from the Military Service as per Rule 116 (17) & (18) of Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982. The Ministry of Defence, Government of India, has taken a decision to grant dual family pension to families of Ex-Servicemen vide circular dt.17/01/2013 w.r.t the service rendered in Military as well as Civil employment. The State Government is pleased to extend this benefit to the families of Ex-Servicemen who were re-employed in civil posts in the State Government.

**Resolution**

1. The State Government has decided to amend the Rule 116 (17) & (18) of Maharashtra Civil Services (Pension) Rules 1982, so as to grant dual pension to families of deceased Ex-Servicemen who were re-employed prior to dt.01/11/2005, on a civil post in the State Government, after having retired from the Military Service.
2. This resolution shall be effective retrospectively w.e.f. dt.24/09/2012. As such the family of the deceased Ex-Servicemen will be entitled to this benefit from dt.24/09/2012. Even in cases where the Ex-Serviceman expired before dt.24/09/2012, the family pension would be payable to the eligible family pensioners w.e.f. dt. 24/09/2012.
3. The eligible family pensioners (as defined in Rule 116 (16) (b) of Maharashtra Civil services (Pension) Rules 1982 & G.R. dated 22.01.2015) should apply for family

pension, with the following documents, to the Head of the Office where the Ex-Serviceman worked prior to his retirement or death.

1) Death Certificate of the Ex-Serviceman,

2) Copy of grant of family pension from Military Authorities (PPO)

3) If Ex-Serviceman was receiving pension from civil services, then a copy of pension payment order (PPO).

4. This is applicable only in cases, where the Ex-Serviceman joined the civilian post in the State Government prior to dt.01/11/2005.

5. Retired Ex-Servicemen who are in receipt of pension for Military as well as Civilian employment should apply for dual family pension to the Head of the Office from which he retired. The application should contain the details of the name of the legal spouse, parents in case of single employee (i.e. all those who have been defined as eligible for family pension under rule 116(16)(b)), permanent residential address, joint photograph of husband and wife (3 copies).

6. This application should be accompanied by the pension payment order (PPO) for Civil employment.

7. The Head of the Office shall submit the documents for family pension payment order to the Office of the Accountant General by following due procedure.

8. Government is also pleased to direct that above decision should mutatis mutandis, apply to those pensioners including family pensioners of Recognised and Aided Educational Institutions, Non-Agricultural Universities and Affiliated Non-Government Colleges and Agricultural Universities to whom the pension scheme is applicable.

9. In exercise of the powers conferred by the proviso to Section 248 of the Maharashtra Zilla Parishads and Panchayat Samities Act, 1961 (Mah. V of 1962) and of all the other powers enabling it in that behalf, Government is further pleased to decide that the above decision shall apply to the pensioners including family pensioners of Zilla Parishads

This Government resolution of Maharashtra Government is available at the website www.maharashtra.gov.in. Reference no. for this is 201504271814499805. This order has been signed digitally.

By order and in the name of the Governor of Maharashtra.

Sunil Pandurang Pandhare

Digitally signed by Sunil Pandurang Pandhare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8b7dc58e83c9774e4419a7aeeac77eae7cdea272d759dfb29451bcfe7e3f04c9, cn=Sunil Pandurang Pandhare
Date: 2015.04.27 18:29:54 +05'30'

**( Sunil Pandhare )**

Under Secretary to Government of Maharashtra